२४|प.१९

**प्रशिक्षणासाठी निवड व अनुपस्थितीबाबत कारवाई...**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**परिपत्रक क्र.वाल्मी-२०१२/३२४/(७८/२०१२)/आ (प्रशि)**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २८ मार्च, २०१२.**

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र.टीजीओ-२००९/(५०४/२००९)/आ (प्रशि), दि.१८.१२.२००९.

**परिपत्रक :**

केंद्र शासनाच्या/राज्य शासनाच्या/खाजगी संस्थांकडून विविध प्रशिक्षण/ परिषद/ कार्यशाळा आयोजित करण्यात येतात. जलसंपदा विभाग, आ (प्रशि) कार्यासनामधून राज्याबाहेरील/परदेशातील प्रशिक्षणासाठी/कार्यशाळेसाठी संबंधित अधिकाऱ्यांची निवड केली जाते व त्यांची नामांकने संबंधित संस्थांना कळविण्यात येतात. अशा परिस्थितीत जे अधिकारी प्रशिक्षणास/कार्यशाळेस अनुपस्थित राहतात, त्यांच्याविरुध्द शासन स्तरावरुन दंडात्मक कार्यवाही करणे किंवा ताकीद/समज देणे अथवा संयुक्तिक कारणास्तव सूट देणे, अशी कार्यवाही करण्यात येते.

वाल्मी/मेटा, यांच्या स्तरावरुन आयोजित करण्यात येणारे प्रशिक्षण/कार्यशाळा/परिषद इ. कार्यक्रम सुरळीतपणे पार पाडण्यासाठी खालीलप्रमाणे सर्वसाधारण सूचना देण्यात येत आहेत.

१) प्रशिक्षण आयोजित करण्यापूर्वी प्रशिक्षण वर्गाची क्षमता लक्षात घेवून, त्या क्षमतेपेक्षा १५ ते २० % जास्तीची नामांकने निवडण्यात यावीत.

२) नियंत्रक अधिकाऱ्यांनी, योग्य व्यक्तीची नामनिर्देशने, विहीत मुदतीच्या एक आठवडा आधी, योग्य प्राधिका-यांकडे पोहोचतील, याची खबरदारी घ्यावी.

३) वाल्मी/मेटा, यांचेकडून आयोजित केलेल्या प्रशिक्षणास गैरहजर राहिलेल्या प्रशिक्षणार्थ्यांविरुध्द संदर्भाधिन परिपत्रकातील सूचनांनुसार दंडात्मक कार्यवाही किंवा ताकीद/समज देणे किंवा नामनिर्देशीत अधिकाऱ्यांची/कर्मचा-यांची व्यक्तिगत अडचण किंवा अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत अन्य अपरिहार्य कारण विचारात घेऊन काहींना सूट देण्याचे अधिकार महासंचालक, वाल्मी/मेटा यांना राहतील.



संकेतांक क्रमांक- 201412081111223427

वाल्मी/मेटा यांच्याकडून आयोजित केलेल्या प्रशिक्षणासंदर्भात निवड झालेल्या प्रशिक्षणार्थींची अथवा कार्यालयाची रास्त (genuine) अडचण आहे अशी खात्री झाल्यावर त्यांच्याबदली समकक्ष प्रशिक्षणार्थी पाठविण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील, जेणेकरुन प्रशिक्षण सत्र/वर्ग पूर्ण क्षमतेने सुरु राहील.

देशांतर्गत / परदेशात प्रशिक्षण / परिसंवाद / चर्चासत्रे / कार्यशाळेस जाऊन आल्यानंतरचा प्रशिक्षण अहवाल संबंधित प्रशिक्षणार्थ्यांने शासनास १५ दिवसांत सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मं. र. कर्णिक )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग,
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.

२. त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर परिपत्रकातील सूचना अनुपालनार्थ त्यांचे नियंत्रणाखालील सर्व अधिकारी/कर्मचारी यांचे निदर्शनास आणून द्याव्यात.

प्रत,

आ (प्रशि) कार्यासन संग्रहार्थ.
निवड नस्ती

E:\shewale\Folder 2012\C R 78 of 2012.doc